राहेरा (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मोताळा, जि. बुलढाणा, या योजनेस सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लपायो २२१३/५९/१३/लपा-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.०७.२०१४

**पहावे**

१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.- विपाविम/कातां७/(१८/२००८)२०१२, दि. ५.२.२०१३
२) वित्त विभागाचे पत्र क्र व्यअस-२०१४/प्र.क्र.५१/अर्थसं-२, दि.२८.३.२०१४

**प्रस्तावना**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळा अंतर्गत असलेल्या राहेरा (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मोताळा जि. बुलढाणा या योजनेस महामंडळ निर्णय क्र. विमाविम/कातां७/३६/राहेरा /प्रमा(६१/२००८)२००९, दि.०५/०२/२००९ अन्वये एकूण रू. ८०८.००८ लक्ष किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली . यापैकी रू. ४२.९६ लक्ष अनुषंगिक खर्च आहे. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००८-०९ च्या दरसूचीप्रमाणे अनुज्ञेय दर वापरण्यात आले होते. या योजनेच्या कामास सन २००९ मध्ये सुरूवात झाली. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या किंमतीत दरसूचीतील वाढ, भूसंपादन खर्चातील वाढ, जास्त दराची निविदा स्विकृती,संकल्पनातील बदल व इतर कारणांमुळे प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या दहा टक्क्याहून अधिक वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे बाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राहेरा (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना, ता. मोताळा, जि. बुलढाणा, या योजनेच्या एकूण रु. १७१८.९९५ लक्ष (रूपये सतरा कोटी, अठरा लक्ष, नव्याणव हजार पाचशे, फक्त) किंमतीस, योजनेची उर्वरित कामे सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत जून २०१५ पर्यंत पूर्ण करण्याच्या अटीवर सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर रकमेपैकी रूपये १६१४.९९३ लक्ष (रूपये सोळा कोटी, चौदा लक्ष, नव्याणव हजार तीनशे, फक्त ) कामाप्रीत्यर्थ व रूपये १०४.००२ लक्ष (रूपये एक कोटी, चार लक्ष, दोनशे फक्त)

अनुषंगिक खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २०११-१२ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, "४७०२ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत, संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ५१०१ " या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८८/का १४३४, दिनांक १५.०७.२०१३ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३७८ /व्यय-१२/, दिनांक २९.११.२०१३ नुसार दिलेल्या सहमतीनुसार त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या पत्र क्र. व्यअस/२०१४/पक्र५१/अर्थसंकल्प २, दिनांक २८.०३.२०१४ अन्वये व्यय अग्रक्रम समितीच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (६८/२०१४) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१४१२४७९६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2014.07.22 14:10:57 +05'30'

**( रा.बा. क्षीरसागर)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३ २
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
६. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती

(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)

७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. जिल्हाधिकारी, बुलढाणा

९. अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला.

१०. कार्यकारी अभियंता, बुलढाणा पाटबंधारे विभाग, बुलढाणा

११. अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)

१४. लपा-२, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : लपात २२१३/(५९/१३)/लपा -२, दि. १७.०७.२०१४ चे परिशिष्ट**
**राहेरा (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मोताळा जि. बुलढाणा**
**उपशिर्षनिहाय तरतूदी**

| क्र. | उपशिर्ष | सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत (रक्कम रूपये लाखात) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | ३.६३८ |
| २ | 'बी' भूसंपादन | ५७४.९७२ |
| ३ | 'सी' कामे | ९९०.६९८ |
| ४ | 'डी' विमोचक | ३८.२३६ |
| ५ | 'के'इमारत | २.००० |
| ६ | 'ओ' संकिर्ण | १.००० |
| ७ | 'पी' देखभाल | २.४४९ |
| ८ | 'आर' दळणवळण | १.००० |
| ९ | पर्यावरण | १.००० |
| १० | **एकूण** | **१६१४.९९३** |
| ११ | **आनुषंगिक खर्च** | **१०४.००२** |
| १२ | **योजनेची एकूण किंमत** | **१७१८.९९५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेची सिंचन क्षमता ४६५ हेक्टर आहे.
ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २७३२ सघमी. आहे.
क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रू. ६२९१२ /- (मापदंड रू. ३८३१६ /- )
ड) आर्थिक परतावा दर १८.९५ %